**सन २०२४-२५ या वित्तीय वर्षासाठी महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ, मुंबई यांना सहाय्यक अनुदान वितरीत करण्याबाबत (माहे जानेवारी-२०२५ व मार्च-२०२५ वेतन).**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :- लेखाअ-२०२४/प्र.क्र.३२/उद्योग-६.**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १० मार्च, २०२५.

**वाचा :** १) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५/०७/२०२४.
२) शासन निर्णय क्र. लेखाअ-२०२४/प्र.क्र.३२/उद्योग-६, दि.२४/०५/२०२४, दि.०२/०९/२०२४ व दि.०७/१०/२०२४.
४) अर्थ सल्लागार व मुख्य लेखा अधिकारी, महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ यांचे पत्र क्र.कार्यासन-६/रानिवि/३६५०, दि.२०/११/२०२४.

**प्रस्तावना:-**

संदर्भ क्र.१ च्या शासन परिपत्रकान्वये महाराष्ट्र विनियोजन अधिनियम, २०२४ च्या अनुसूचीतील स्तंभ ४ मध्ये विनिर्दिष्ठ करण्यात आलेल्या रकमांस विधानमंडळाने मंजूरी दिलेली असून, महाराष्ट्राचे मा. राज्यपाल महोदयांनी त्यास अधिसंमती दिलेली आहे. त्यानुसार महाराष्ट्र विनियोजन अधिनियम, २०२३ हा महाराष्ट्र अधिनियम क्र. २७ म्हणून महाराष्ट्र असाधारण राजपत्र भाग-४ मध्ये दि.१८ जुलै, २०२४ रोजी प्रसिध्द करण्यात आलेला आहे.

**२.** महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळास ३६-सहाय्यक अनुदान (वेतन) या प्रयोजनासाठी आवश्यक तरतूद करण्यात आलेली आहे. वित्त विभागाने अनुदान अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध करून दिले आहे. महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळाचा माहे जानेवारी-२०२५ व मार्च-२०२५ या महिन्यांचा मंडळाच्या मुख्य व जिल्हा कार्यालयातील अधिकारी / कर्मचा-यांचे वेतन, सेवानिवृत्ती वेतन, सेवाउपदान, अंशराशीकरण, रजारोखीकरण इ. वरील खर्च भागविण्यासाठी अनुदान उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळाचा मुख्य व जिल्हा कार्यालयातील अधिकारी / कर्मचा-यांचे वेतन, सेवानिवृत्ती वेतन, सेवाउपदान, अंशराशीकरण, रजारोखीकरण इ. वरील खर्च भागविण्यासाठी ३६-सहाय्यक अनुदान (वेतन) या प्रयोजनासाठी **रुपये १०,७७,७३,०००/- (रुपये दहा कोटी, सत्त्याहत्तर लाख, त्र्याहत्तर हजार फ़क्त)** इतके अनुदान वितरीत करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

**२.** यावरील खर्च मागणी क्रमांक के-७, २८५१, ग्रामोद्योग व लघुउद्योग, १०५ खादी व ग्रामोद्योग (००) (००) (०१) खादी व ग्रामोद्योग मंडळाला सहाय्यक अनुदान (दत्तमत) (२८५१ ०५८५) ३६, सहाय्यक अनुदान (वेतन) या उद्दिष्टांखालील सन २०२४-२५ या अर्थसंकल्पीय वर्षासाठी मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व तो त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

**३.** सदर रक्कमेच्या आहरण व संवितरणाचे अधिकार विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांच्या कार्यालयातील लेखा अधिकारी यांना देण्यात आलेले आहेत. सदर अनुदान खर्च झाल्याबाबतचे विनियोग प्रमाणपत्र मंडळाने शासनास व आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना विहित कालावधीत सादर करावे. तसेच लेख्यांच्या खर्चमेळाबाबत महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई यांच्याकडून विचारणा करण्यात येईल, तेव्हा

लेख्यासंबंधीची आवश्यक ती कागदपत्रे मंडळाने महालेखापाल कार्यालयास सादर करावीत. यापुढील सहाय्यक अनुदान (वेतन) या उद्दिष्टाखालील प्रस्ताव शासनास सादर करतांना मंडळाच्या मुख्य व जिल्हा कार्यालयातील अधिकारी/कर्मचारी यांचा तपशिल अथवा विगतवारी प्रस्तावात नमूद करण्यात यावी.

४. सदर शासन निर्णय, वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दि.१७ एप्रिल, २०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८-भाग-१, उपविभाग-१, अनुक्रमांक २७ नियम क्रमांक १४९ अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे. तसेच वित्त विभागाच्या सहमतीने त्यांचा ई-फाइल वरील Note # ६०/व्यय-१६, दि.२०/०२/२०२५ अन्वये देण्यात आलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२५०३१०१४३०३४०२१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by AJIT TUKARAM SASULKAR
Date: 2025.03.10 14:31:24 +05'30'

**(अजित सासुलकर)**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत :-**

**माहितीसाठी व आवश्यक त्या उचित कार्यवाहीसाठी अग्रेषित**

१. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई.
२. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ, मुंबई.
३. अर्थ सल्लागार व मुख्य लेखाधिकारी, महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ, मुंबई.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८. वरिष्ठ उप महालेखापाल (पडताळणी) बाह्य लेखा परीक्षा विभाग, मुंबई.
९. लेखा अधिकारी, उद्योग संचालनालय, नवीन प्रशासन भवन, मुंबई. (५ प्रती)
१०. कार्यासन अधिकारी, वित्त विभाग (व्यय-१६/अर्थसंकल्प-१४/अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई-३२
११. कार्यासन अधिकारी (प्रशासन-१), उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. निवड नस्ती (उद्योग-६).